नदेज्दा कालिनिना

# चला जाऊ बालवाडीला!

अनुवाद : अनिल हवालदार





प्रगती प्रकाशन
मॉस्को



लोकवाङ्मय गृह प्रा. लि.
मुंबई



# लाल-सोनेरी मासे

बालवाडीमध्ये खिडकीपाशी छोट्या टेबलावर एक मत्स्यालय आहे. त्यात लाल-सोनेरी मासे आहेत. ते ह्या काचेच्या घरात मोठ्या मजेनं राहतात. मत्स्यालय नेहमी स्वच्छ असते. त्यात नेहमी ताजे पाणी असते. त्याच्या तळाशी पिवळी वाळू, छोटे गोटे, समुद्र शिंपले आणि समुद्रशेवाळ आहे.

रोज सकाळी मुले माशांना खाऊ घालतात. माशांचे खाणे पाण्यामध्ये शिंपडतात.

एके सकाळी वेरा इवानोवना पाण्याचे एक मोठे तसराळे घेऊन आल्या. मत्स्यालयामधून त्यांनी मासे बाहेर काढले आणि तसराळ्यात ठेवले. मग त्यांनी मत्स्यालयाच्या काचेच्या भिंती धुवायला सुरुवात केली. त्यांचे धुणे चालू होते तेव्हा तसराळ्यात पोहणारे लाल-सोनेरी मासे मुले पहात होती.

"माझ्या बाहुलीलासुद्धा पहायचंय," लेना म्हणाली.

तिच्या बाहुलीला जागा करून देण्यासाठी मुले थोडी बाजूला सरली. बाहुली खाली वाकली, लेनाच्या हातून निसटली व तसराळ्यात पडली. धप्प असा आवाज झाला आणि पाणी वर उडाले. एक लाल-सोनेरी मासा चक्क फरशीवर पडला. धापा टाकीत तो तेथे तडफडू लागला.

प्रत्येकजण एकाच वेळी ओरडू लागला. वेरा इवानोवना यांनी पटकन माशाला उचलले आणि परत पाण्यात सोडले. पाण्याशिवाय एकही मासा जिवंत राहू शकत नाही.

# ओळखा पाहू!

एके दिवशी वेरा इवानोवना बालवाडीत एक झाकलेली टोपली घेऊन आल्या. त्या म्हणाल्या :
"मुलांनो, ओळखा पाहू :

दोन टोकदार कान उभे
चार गुबगुबीत छान पंजे
फिस्कारलेल्या मिशा भल्या
अणकुचीदार नख्या छोटच्या
दिवसा झोपतो डाराडूर
पसरून पाय लांब छान
पण होताच रात्रीचा अंधार
शिकारीला हे झाले तयार!"

मुले गप्प बसून राहिली. कुणालाही ह्या कोड्याचे उत्तर माहीत नव्हते. पण "उत्तर" स्वतःच टोपलीमधून डोकावून बाहेर पाहू लागले होते.



# मी कोण होणार

मुले आपापसात गप्पा मारीत बसली होती.
"मी वैमानिक होणार."
"मी इंजिन ड्रायव्हर होणार."
"मी मोटार ड्रायव्हर होणार."
"मी खलाशी बनून समुद्रावर जाणार."
"मी डॉक्टर होऊन सगळ्यांना बरं करणार."
"मला शिक्षिका व्हायचंय," लेना म्हणाली.
"मला घरं बांधायची आहेत, सुंदर मोठ्ठी घरं," ओल्गा म्हणाली.
हा सारा वेळपर्यंत साशा आणि आल्योशा मात्र काहीच बोलले नव्हते.
"मोठेपणी तुम्ही कोण होणार?" वेरा इवानोवना यांनी त्यांना विचारले.
"आमच्या बाबांबरोबर आम्ही कारखान्यात काम करणार आहोत," साशा म्हणाला.





# घराची बांधणी

एके दिवशी ओल्गाचे वडील मुलांना भेटायला आले. ते घरे बांधण्याचे काम करीत.

"तुम्ही मोठ्ठी घरं कशी बांधता ते आम्हाला सांगा," मुले म्हणाली.

"आपण एकत्र मिळून एक घर बांधू या. स्वतः काम करणं हा शिकण्याचा सर्वांत उत्तम मार्ग आहे," ओल्गाचे वडील म्हणाले.

त्यांनी एक पेन्सिल आणि कागद घेतला व एका घराचे चित्र काढले. "हे घर आपण आता बांधू. आता त्याच्यासाठी प्रथम आपल्याला जागा शोधली पाहिजे. ह्या घरासाठी मोकळी जागा असण्याची गरज आहे."

मुलांनी फरशीवरील आपली खेळणी उचलली आणि खुर्च्या बाजूला सरकविल्या. आता घर बांधण्यासाठी मोकळी जागा झाली. पहिल्यांदा, विटा आणि तुळया वाहून न्यायच्या होत्या.

खरोखरीच्या बांधकामाच्या ठिकाणाप्रमाणे ट्रक मोटारी घरघर करीत खेपा घालू लागल्या. भिंतींसाठी विटा व छतांसाठी तुळया वाहून नेण्याचे काम मुले करीत होती. एका कार्डबोर्डच्या तुकड्यामधून दारे आणि खिडक्या कापण्याचे काम करण्यात वेरा इवानोवना गुंतल्या होत्या.

ओल्गाचे वडील म्हणाले: "बांधकामाच्या ठिकाणी नेहमी एक उंच यारी असते. खास रुळांवरून ती फिरते आणि विटांनी भरलेल्या लोखंडी टोपल्या दहा मजल्यांपर्यंत किंवा त्याहून उंच वर चढविण्यासाठी तिला मोठे पोलादी आकडे असतात. पण आपल्याला मात्र यारीशिवायच काम करावं लागेल. गवंड्यांनी वेगानं विटा घालणं आणि सुतारांनी पटापटा त्यांच्यात दारं-खिडक्या बसवणं हे सर्वांत महत्त्वाचं असतं."

# साशा आणि आल्योशा

साशा आणि आल्योशा हे दोन जुळे भाऊ होते. शहरामधील एका मोठ्या घराच्या चौथ्या मजल्यावर ते रहात होते. जेव्हा ते थोडे मोठे झाले तेव्हा एके दिवशी त्यांचे आई-बाबा म्हणाले :

"मुलांना आता बालवाडीला जायला पाहिजे."

"बालवाडीला! बालवाडीला! आम्ही जाणार बालवाडीला!" साशा आनंदाने ओरडला.

पण आल्योशाने विचारले : "बालवाडी म्हणजे काय?"

"लौकरच तुला समजेल. मग तू आम्हाला त्याबद्दल सगळं सांगशील," बाबा म्हणाले.

"तुम्हाला तिथं खूप नवी मित्रमंडळी भेटतील. तुम्ही एकत्र खेळाल, फिरायला जाल आणि खूप खूप नव्या गोष्टी शिकाल!" आई म्हणाली.



# बालवाडीतील पहिला दिवस

आई मुलांना घेऊन बालवाडीत गेली. आल्योशा सारखा तिच्या हाताला धरून तिला मागे खेचत होता. तो घाबरला होता आणि केविलवाण्या आवाजात म्हणत होता :

"मला घरी जायचंय!"

साशा मात्र मुळीच घाबरला नव्हता. तो मुलांकडे पहात होता. दोन वेण्यांच्या शेपट्या घातलेली एक मुलगी त्यांच्यापाशी आली व म्हणाली, "जरा थांबा. मी आत्ता वेरा इवानोवना यांना बोलावून आणते!"

सर्वांत लहान मुलांच्या गटाच्या शिक्षिका वेरा इवानोवना आल्या आणि म्हणाल्या :

"नमस्ते, साशा आणि आल्योशा. आता तुमच्यातला साशा कोण आणि आल्योशा कोण?

मी ओळखून काढण्याचा प्रयत्न करते हं! जो पुढं उभा आहे आणि मुळीच लाजत नाही तो आल्योशा! आणि आईच्या मागं लपलाय तो साशा!"

साशा हसला आणि म्हणाला, "मुळीच नाही! आईच्या मागं लपलाय तो आल्योशा!"

"अरे आल्योशा माझ्याबरोबर लपंडावाचा खेळ खेळतोय, होय ना रे?" वेरा इवानोवना गंमतीने म्हणाल्या. "मुलांनो, तिथं खेळणी तुमची वाट पाहताहेत. आणि फडताळावर ठोकळे आहेत ना, त्यांच्यापासून तुम्ही आगबोट बांधू शकाल!"

वेरा इवानोवना यांचा चेहरा खूप प्रेमळ होता. अत्यंत सौम्य आवाजात त्या बोलत होत्या. साशा आणि आल्योशा यांना प्रेमाने थोपटीत त्या म्हणाल्या, "चला मुलांनो, तुमच्या कोट-टोप्या उतरवून ठेवा. आल्योशा, हे तुझं कपाट आणि साशा, हे तुझं कपाट. ह्या आकडचाला कोट टांगायचा, इथं फडताळावर टोपी ठेवायची आणि इथं खाली बूट ठेवायचे. सगळी मुलं आपापल्या वस्तू अशाच ठेवतात. प्रत्येक कपाटावर आम्ही चित्र चिकटवू, म्हणजे आपलं कपाट कोणतं ते ओळखायला तुम्हाला सोपं जाईल."

काही मुले धावत गेली व सोबत डिंकाची बाटली आणि दोन चित्रे घेऊन आली. एक चित्र होते विमानाचे आणि दुसरे घोडचाचे. वेरा इवानोवना यांनी साशाच्या कपाटावर विमानाचे चित्र चिकटविले व आल्योशाच्या कपाटावर घोडचाचे.

"खेळांच्या खोलीत असाच सुंदर घोडा आहे," वेरा इवानोवना म्हणाल्या.

"खूप मोठा घोडा आहे. चाकांवरचा. चला, आम्ही तुम्हाला दाखवतो!" मुले म्हणाली.

"पळा रे दोघं," आई म्हणाली. "आता मी जाते. चांगलं वागायचं बरं का! संध्याकाळी पाच वाजता मी तुम्हाला न्यायला येईन."







# असे कुणी खेळते का?

साशा आणि आल्योशा आपल्या गटातील मुलांबरोबर खेळण्याच्या खोलीत गेले. तेथे चिक्कार खेळणी होती: अस्वले, ससे, बाहुल्या, बाहुल्यांची भांडी आणि त्यांचे पलंग, मोटारी, ट्रक आणि आगीचे बंब. तेथे पांढऱ्या घोड्यावर बसलेले एक अस्वलही होते.

आल्योशा त्या खेळण्यांकडे नुसता पहातच राहिला. कोणते खेळणे घ्यावे तेच त्याला समजेना. साशाने त्या खेळण्यांकडे नजर टाकली आणि त्याला ती सगळी खेळणी घ्यावीशी वाटली.

तो त्या खेळण्यांकडे धावत गेला. एका काखेत त्याने अस्वल धरले, एका खिशात छोटा ससा कोंबला, बाहुलीचा पलंग आणि तिची काही भांडी उचलली. त्या खेळण्यांचा त्याने एक ढीग रचला व त्यावर खेळण्यातील कुत्रा ठेवला. मग सर्व मुलांना दम भरीत तो म्हणाला: "ह्या खेळण्यांना कुणी हात लावीत तर खबरदार! एकटा मी ह्या खेळण्यांबरोबर खेळणार आहे."

मुले भोवती उभी होती व त्याच्याकडे पहात होती. त्यांना आश्चर्य वाटले. काय विचित्र मुलगा आहे! असे कुणी खेळते का?

# मी मदत करतोय !

दुपारच्या जेवणाची वेळ झाली होती. साशाशेजारी लेना नांवाची एक मुलगी टेबलाशी बसली होती. लेना ही खूप चांगली मुलगी होती, पण ती अगदी कमी खायची. चमचाभर सार चाखले म्हणजे नंतर खूप वेळपर्यंत नुसतीच दुसऱ्या मुलांकडे पहात बसायची.

"तुझं सार गार होण्यापूर्वी पी! गार झाल्यावर ते चांगलं लागणार नाही," वेरा इवानोवना तिला म्हणाल्या.

पण लेना नुसतीच चमच्याने सार ढवळीत राहिली.

साशा पट्टीचा खाणारा होता. त्याने सर्वांत पहिल्यांदा सार संपविले. "माझं सार संपलं! पहा, माझी बशी रिकामी आहे," तो म्हणाला. मग त्याचे लेनाच्या भरलेल्या बशीकडे लक्ष गेले. थोडा वेळपर्यंत त्याने तिच्याकडे पाहिले, मग आपला चमचा उचलला व लेनाच्या बशी-मधील सार तो भराभरा ओरपू लागला.

"साशा माझं सार पितोय!" लेना रडव्या आवाजात ओरडली.

"मी तिचं सार पीत नाही, मी तिला मदत करतोय," दुखावल्या आवाजात साशा म्हणाला.

"तू मला मदत करण्याची मुळीच जरूर नाही. माझी मी पिईन!"

वेरा इवानोवना यांनी लेनाला साराची दुसरी बशी दिली. लेनाने चमचा उचलला आणि भराभरा सार गट्ट करून सर्वांना चकित केले.





# मुले कसे खेळली

"पहा, तुमच्यासाठी माझ्यापाशी काय आहे ते!" वेरा इवानोवना मुलांना म्हणाल्या आणि कपाटामधून त्यांनी एक मोठा खोका काढला. खुर्चीवर त्यांनी तो खोका ठेवला व उघडला. त्या खोक्यात लहान-मोठ्या लाकडी बाहुल्या होत्या. एकात एक बसणाऱ्या ह्या लाकडी बाहुल्यांना 'मात्र्योष्का' म्हणतात.

वेरा इवानोवना यांनी मुलांना सांगितले: "मोठी बाहुली म्हणजे आई आणि छोटी बाहुली म्हणजे तिची मुलगी. आता तुम्हाला हवी ती बाहुली उचला."

मुलांनी प्रत्येकी एकेक बाहुली उचलली व ती खेळू लागली. आई-मात्र्योष्कांनी आपल्या मुलींचा निरोप घेतला आणि त्या कामावर गेल्या. छोटचा मात्र्योष्का खेळायला पळाल्या लांब शेपटीच्या पोपटापर्यंत त्या धावत गेल्या आणि त्यांनी त्याला घाबरवले. दुसरी खेळणी त्यांनी निरखून पाहिली व पुस्तकांच्या फडताळात त्या डोकावल्या. साशाची बाहुली ट्रकमध्ये बसून सबंध खोलीभर भटकली. ओल्गाची बाहुली बाबागाडीमधून फिरायला गेली.

वेरा इवानोवना गाऊ लागल्या आणि ताल धरण्यासाठी टाळी वाजवू लागल्या. बाहुल्या नाचू लागल्या. भरपूर भटकून झाल्यानंतर आणि खेळून संपल्यानंतर त्यांची घरी जायची वेळ झाली. आई-मात्र्योष्का घरात त्यांची वाट पहात होत्या. आपल्या मुलांना त्यांनी टेबलाभोवती बसविले व त्या म्हणाल्या: "हे तुमचं छान छान जेवण. सगळं खाऊन बशी स्वच्छ करायची!"

लहान बाहुल्या जेवल्या. आता त्यांची झोपायची वेळ झाली होती. वेरा इवानोवना यांनी प्रत्येक मुलाला एक छोटी पेटी दिली. त्या प्रत्येक पेटीत छोटी उशी आणि पांघरुण होते.

आई-मात्र्योष्कांनी छोटचा बाहुल्यांना निजविले. मग मुलांनी टेबलावर त्या पेटचा एका ओळीत ठेवल्या. बालवाडीमध्ये त्यांचे स्वतःचे पलंग होते त्याप्रमाणे. मग आई-मात्र्योष्कांना त्यांनी एका ओळीत खिडकीच्या चौकटीत ठेवले.

"आम्ही जेव्हा फिरायला जाऊ तेव्हा खिडकीमधून त्या आम्हाला बघतील," ओल्गा म्हणाली.

कोट-टोप्या घेण्यासाठी मुले अगदी हलक्या पावलांनी खोलीमधून बाहेर पडली. छोटचा बाहुल्यांची झोप मोडू नये म्हणून ती अगदी खालच्या आवाजात बोलत होती. मुलांचे फिरून होईपर्यंत छोटचा बाहुल्यांची एक डुलकी संपली असती.



# मुलांनी रस्त्यावर काय पाहिले

रस्त्यावर फिरताना मुलांनी ह्या गोष्टी पाहिल्या :

एक नवे मोठे घर. चकचकीत बसगाडी. ट्रेलर जोडलेला ट्रक. फटफटीवरून जाणारा पोलीस. झुलत्या शिडीचा आगीचा बंब. दूध नेणारी मोटार. 'पबेदा', 'मस्कविच', 'वोल्गा' मोटारी. विजेच्या तारा दुरुस्त करण्याची उंच मोटार.



सर्व मुले कामात गुंतली होती. त्यांनी एक मजला बांधून पुरा केला होता आणि दुसरा मजला चढवायला सुरुवात केली होती. बांधकाम चोख आणि व्यवस्थित होण्यासाठी ओल्गाचे वडील देखरेख करीत होते व मुलांना मदत करीत होते.

काम खूप वेगात चालू होते. खालच्या मजल्यावरचे सर्व गाळे तयार झाले होते. दुसऱ्या मजल्यावर रंगारी रंगकाम करीत होते आणि तिसऱ्या मजल्यावर गिलाव्याचे काम चालू होते. मग पावसापासून बचाव करण्यासाठी त्यांनी छप्पर घातले. लाकडी हातोडे छप्पर बसविण्याचे काम दणादण करीत होते. दरम्यान इतर मुले घराभोवतीची जागा साफ करीत होती, झाडे लावीत होती आणि गॅरेज बांधीत होती. लौकरच सर्व काही तयार झाले.

ओल्गाच्या वडिलांनी काढलेल्या चित्राप्रमाणे हुबेहूब घर तयार झाले.

मुलांना आपले घर आवडले. कारण त्यांनी ते घर स्वतःच बांधले होते.



# बालवाडीला जायची घाई का?

कारण आमचे मित्र आमची वाट पहात आहेत. एकत्र पळापळ करण्यात, खेळण्यात आणि शिकण्यात खूप मजा आहे.

कारण वेरा इवानोवना आम्हाला खरेखुरे बांधण्यात येणारे घर बघायला घेऊन जाणार आहेत. कदाचित तसेच घर आम्ही नंतर बांधू.

कारण कालच लेनाचे वडील आमच्या बालवाडीत आले होते. ते खलाशी आहेत. खऱ्या-खुऱ्या मोठ्या बोटींची माहिती त्यांनी आम्हाला सांगितली. आणि आज दुसऱ्या कुणाचे तरी वडील किंवा आई आम्हाला भेटायला येतील आणि दुसऱ्या खूप खूप मजेदार गोष्टी सांगतील.

कारण ओल्गा, साशा, आल्योशा, लेना आणि आम्ही सारे नेहमी खूप कामात आहोत. आम्ही रोपांना पाणी घालतो, लाल-सोनेरी माशांना खाऊ घालतो आणि लांब शेपूटवाल्या पोपटाची काळजी वाहतो. पोपट पिंजऱ्यात उड्या मारीत असतो, आमची वाट पहात असतो. आम्ही त्याचा पिंजरा स्वच्छ करू, त्याची पाण्याची बशी धुवून ठेवू आणि त्याला खाण्यासाठी दाणे देऊ, हे त्याला माहीत आहे.

कारण पांढऱ्या घोड्यावरचे अस्वल आल्योशाला भेटायला बाहेर येईल. अस्वलासाठी तो ठोकळ्यांचे घर बांधील आणि घोड्याला तबेल्यात ठेवील.

कारण वेरा इवानोवना आम्हाला छान छान गोष्ट सांगतील. रंगीबेरंगी चित्रांची नवी पुस्तके आमच्यासाठी आणतील. चित्रे काढण्यासाठी आम्हाला कागद आणि रंग देतील. गंमतीचे खेळ शिकवतील.

म्हणून सकाळी आम्ही बालवाडीला घाईघाईने जातो.